# UTARRAMCHARITRA

A DRAMA IN SEVEN ACTS

TRANSLATED FROM SANSCRIT INTO MARATHI

BY

PARSHURÁMPANT GODBOLE

ACCEPTED BY

THE DUXINA PRIZE COMMITTEE

BOMBAY:

PRINTED AT L. M. D'SOUZA'S PRESS.

1859.

# उत्तररामचरित्र नाटक

समार्का.

हा ग्रंथ संस्कृत मूल ग्रंथावरून

मराठी भाषेंत

परशुरामपंत गोडबोले

यांनी केला.

तो दक्षिणाप्राइजकमिटीनें पसंत करून

मुकाम मुंबई येथें;

एल. एच. डीमोंजा यांच्या छापखान्यांत छापिला.

इसवी सन १८५९.

---

शके १७८१.

# प्रस्तावना.

धारानामक राजधानींत भोजराजाजवळ बहुत पंडित होते, त्यांत कालिदासाच्या बरोबरीचा भवभूति ह्यानांवें एक मोठा विद्वान् कवि होता. त्यानें संस्कृत भाषेंत तीन उत्तम नाटकें केलीं. एक मालतीमाधव, एक वीरचरित्र, आणि एक उत्तररामचरित्र. त्यांत उत्तररामचरित्र हें नाटक विशेषेंकरून विद्वानांस मान्य व रसिकजनांस प्रिय असें आहे. नाटकाचे जे गुण ते सर्व ह्या नाटकांत कवीनें आणिले आहेत. परंतु हा ग्रंथ संस्कृत भाषेंत आहे ह्मणून त्यांतील रस संस्कृत भाषा जाणणाऱ्या पुरुषांस मात्र प्राप्त होतो. प्राकृत जनांस दुर्लभ. तो सर्वांस प्राप्त व्हावा ह्या उद्देशानें त्या नाटकाचें हें मराठी भाषांतर केलें आहे.

त्या कवीनें जो आपल्या ग्रंथांत रस उभा केला आहे तसा रस साधणें इतरांस फार कठीण आहे. तथापि यथामति साधवला तितका साधला आहे. आता याहून उत्तम प्रतीचें भाषांतर होई तोंपर्यंत हें हातीं घेण्यास रसिकजन अनमान करणार नाहींत अशी ह्या भाषांतर कर्त्यास आशा आहे.

संस्कृत भाषेच्या आंगीं शब्दप्रौढी, शब्दलालित्य, अर्थप्रौढी, अर्थलालित्य, अर्थगांभीर्य, मनोरंजकता, इत्यादि गुण आहेत, तसे ह्या मराठी भाषेंत नाहींत, ह्यामुळें, आणि कविताशक्ति

असावी तशी नाहीं ह्यामुळें, संस्कृतांतल्या प्रमाणें रसपरिपाक उतरणार नाहीं हें ही उघडच आहे.

मूळ संस्कृतग्रंथाचें हें भाषांतर असें ह्मटलें, परंतु केवळ शब्दास शब्द अशा रीतीनें केलें असें नाहीं. क्वचित्स्थळीं न्यूनाधिक्य केलें आहे.

मूळग्रंथ गद्यपद्यात्मक आहे. त्याप्रमाणें ह्यांत ही गद्यांचे ठिकाणीं गद्यें आणि पद्यांचे ठिकाणीं पद्यें केलीं आहेत. श्लोकांचीं वृत्तें मूळग्रंथाप्रमाणेंच सर्व आहेत असें नाहीं. ज्या ठिकाणीं जसें साधलें त्याठिकाणीं तसें केलें आहे. कितीएक ठिकाणीं आर्या आहेत. कितीएक ठिकाणीं साक्या, दिंड्या, ओंव्या, पदें, अशीं हीं प्राकृत कवितेच्या चालीप्रमाणें पद्यें केलीं आहेत.

ह्या ग्रंथास उत्तररामचरित्र हें नांव ठेवण्याचें कारण हेंच कीं, भगवान् रामचंद्र अयोध्यापुरींत सिंहासनारूढ झाल्यावर जें चरित्र झालें तें ह्या ग्रंथांत बांधलें आहे.

मूळग्रंथाचे सात अंक ह्मणजे भाग आहेत, त्याप्रमाणें येथें सात अंक केले आहेत. पहिल्या अंकांत लोकापवादामुळें रामानें सीतेचा त्याग केला आहे; दुसऱ्या अंकांत शंबुकवधाच्या निमित्तानें रामचंद्र पंचवटीस गेला आहे; तिसऱ्या अंकांत सीतेच्या विरहानें रामास फार शोक झाला आहे; चवथ्या अंकांत वाल्मीकिमुनीच्या आश्रमास कौसल्या, जनक, वसिष्ठ हे गेले आहेत. पांचव्या अंकांत चंद्रकेतु आणि लव, कुश ह्यांचा युद्ध प्रसंग झाला आहे; सहाव्या अंकांत रामाची आणि लव, कुश ह्यांची भेट झाली आहे; आणि सातव्या अंकांत सर्वांच्या भेटी होऊन वाल्मीकिमुनीनें रामाची आणि सीतेची भेट करून दिली आहे.

मूलग्रंथांत संस्कृत भाषा आणि बालभाषा अशा दोन प्रकारच्या भाषा आहेत, परंतु ह्या भाषांतरांत एक मराठी भाषा मात्र आहे. कोठें कोठें हवेतसे मराठी शब्द न सुचल्यामुळें निरुपाय होऊन संस्कृत भाषेतले शब्द घेतले आहेत. तथापि त्यांचा अर्थ समजण्यास त्याच्या पृष्ठाचे खालच्या अंगास टिपा घातल्या आहेत.

हा ग्रंथ बहुतकरून परस्पर संभाषणरूप आहे. ह्यांत आरंभीं बोलणाराचें नांव लिहून पुढें त्याचें बोलणें लिहिलें आहे. ज्या ठिकाणीं दोहोंकडे ( ) अशा खुणा करून जें त्यांच्या मध्यें वाक्य लिहिलें आहे त्या ठिकाणीं तें वाक्य अर्थ संगतीकरितां कवीचें आहे असें समजावें.

नाटक ग्रंथ जो कोणी वाचावयास घेतो त्यानें इतिहास किंवा बखर इत्यादि ग्रंथाप्रमाणें साधे रीतीनें एक सारखें वाचूं नये. परस्पर भाषणाची लोकरीति मनांत आणून उच्च, नीच कोमल कठोर अशा स्वरभेदानें वाचावें, ह्मणजे वाचणाऱ्यांच्या व ऐकणाऱ्यांच्या मनांत रसाविर्भाव होतो.

ह्या नाटकांत करुणरस आणि शृंगाररस हे प्रधान आहेत. शृंगार आहे तो विप्रलंभ शृंगार, ह्मणजे वियोग कालींचा शृंगार वर्णिला आहे.

हें भाषांतर यथामति केलें आहे. ह्या ग्रंथांत चुकया अर्थाविषयीं आणि शब्दाविषयीं पुष्कळ असतील, परंतु त्यांजकडे दृष्टि न देतां गुणलेशाकडे दृष्टि देऊन उणें असेल तें पूर्ण करणें आणि ग्रंथास मान देणें हें विद्वानांस भूषण आहे.

ह्याप्रमाणेंच दक्षिणाप्रैज कमिटींतील सभासद ह्यांनी हा ग्रंथ मान्य करून तें भूषण मिळविलें येणेंकरून लोकांस नवीन ग्रंथ करण्याविषयीं उत्तेजन दिल्याप्रमाणें होऊन तद्वारा ते लोकोपकाराचे विभागी झाले आहेत.

---

# उत्तररामचरित्र नाटक.

---

## अंक १.

### स्थल.

अयोध्येंतील राजमंदिर.

### पात्रें.

| | |
|---|---|
| सूत्रधार. . . . . . . | नाटककर्ता. |
| नट . . . . . . . | त्याचा सोबती. |
| रामचंद्र. . . . . . . | अयोध्याधीश. |
| सीता . . . . . . | त्याची स्त्री. |
| कंचुकी. . . . . . | चोबदार. |
| अष्टावक्र. . . . . . . | वसिष्ठ शिष्य. |
| लक्ष्मण. . . . . . | रामचंद्राचा भाऊ. |
| द्वारपालिका . . . . . | अंतःपुरांतील दासी. |
| दुर्मुख . . . . . . . | बातमीदार. |

### मंगलाचरण.

#### पद.

गणरायालौकरयावें ॥ गणरायालौकरयावें ॥ ध्रुवपद ॥
करुनिदयादीनावरसदया ॥ सहजबुद्धिबळद्यावें ॥गण०॥ १ ॥
सुरनरकिंनरध्यातीतुजला ॥ विघ्नविनाशाधांवें ॥गण० ॥ २ ॥
शिवसुतमंगलदायकदेवा ॥ दासांमंगलाद्यावें ॥ गण० ॥ ३ ॥

आणिककांहिंनमार्गेंआतां ॥ कार्यसिद्धिलान्यावें ॥ गण० ॥४॥
नारायणसुतविनवितसेकीं ॥ येउनिपददावावें ॥ गण० ॥ ५ ॥

## आर्या.

हाप्राचीनकवींला संततमाझाअसोनमस्कार ॥
ज्यांच्याअनुग्रहानें वाणीपावेनमीं*सुधासार ॥ १ ॥

( मंगलाचरण झाल्यावर सूत्रधार ह्मणतो. )

होहो, फार विस्तार कशास पाहिजे. आज मी भगवान् श्री महाकालेश्वर ह्याच्या यात्रेच्याठायीं महाजनांस विनंती करितों. अहो, आपण जाणतच आहां कीं, काश्यपगोत्रोत्पन्न, ज्याला श्रीकंठ हेंही नाम शोभतें, असा काव्यालंकारनाटकादिसकलकलाभिज्ञ भवभूतिनामा महाकवि आहे.

## आर्या.

ब्रह्म्यालातशि†ज्याला ‡वाग्देवीहोउनी§सुवशराहे ॥
हा,॥तत्कविरचितोत्तर रामचरित्र¶प्रयोगकरिताहे॥ २ ॥

भवभूति कवीनें जें उत्तररामचरित्र ह्या नांवाचें नाटक केलें आहे त्याचा प्रयोग ( खेळ ) तुह्मां पुढें करितों. तर इकडे तुमचें अवधान असावें.

हा मी **कार्यवशें करून अयोध्यावासी आणि त्या काळचा असा झालों आहें. ( इकडे तिकडे पाहून ह्मणतो. ) अहो राक्षस कुलाचा संहार करणारा जो महाराज रामचंद्र ह्यांचा हा ††अभिषेकोत्सवाचा समय आहे. ह्या समयीं रात्रंदिवस अखंडानं-

---

*अमृततुल्य. †ज्याभवभूतीला. ‡सरस्वती §अनुकूल. ॥मी. ¶खेळ. **कांहीं कामाकरितां. ††राज्याभिषेकाचाउत्सव.

दाची वृद्धि असावी. असें असतां राजवाड्यापुढें आज कोठें गडबड दिसत नाहीं हें काय?

( नट प्रवेशकरून, आसमंतात्भागीं अवलोकन करून ह्म० ) हेसूत्रधारा, तुला समजलें नाहीं काय? अरे, लंकायुद्धांत ज्यांशीं सख्य झालें होतें असे मोठमोठे वानर आणि राक्षस लंकेहून येतांना बरोबर आणले होते, आणि राज्याभिषेकाच्या समारंभाकरितां देशोदेशींचे राजर्षि ब्रह्मर्षि आदिकरून मोठमोठे लोक मिळाले होते, त्यांच्या सत्काराकरितां इतके दिवस गडबड चालली होती. आतां ते सर्व लोक महाराजानें आपापल्या स्थानास परत पाठविले. आतां कशाची गडबड असणार?

सूत्रधार—होय खरी गोष्ट. ( स्मरल्यासारखें करून. ) हो, सांप्रतकाळीं आणखी असें झालें आहे.

साकी.

अरुंधतीसहवसिष्ठवेउनिरामाच्यांज्यांमाता ॥
त्याहीगेल्या*तदाश्रमातेंसुखवाया†जामाता ॥ ३ ॥

नट—सूत्रधारा, मला ठाऊक नाहीं ह्मणून मी विचारतों. जामाता ह्मटला हा कोण?

सूत्र०—तुला नाहींका ठाऊक? सांगतों ऐक.

आर्या.

शांतानामेंपूर्वी दशरथराजासजाहलीकन्या ॥
तिजें‡अपत्यभावें लोमपदाला§समर्पिलीधन्या ॥ ४ ॥

---

* ऋष्यशृंगाच्या आश्रमास. † जांवई ऋष्यशृंग. ‡ लोमपादाचेंच आपत्य व्हावें ह्मणून § दत्तक केली.

### साकी.

विभांडकाचासुतजोऋष्यशृंगतयानें*केला ॥
पाणिग्रहशांतेचातेणेंतोजामाताझाला ॥ ५ ॥

### आर्या.

सांप्रततेणेंद्वादश वार्षिकआरंभिलें†महासत्र ॥
तेंकौतुकदेखाया ‡श्वशुरगृहालाहिधाडिलेंपत्र ॥ ६ ॥

### साकी.

जाणुनिजामात्यानेंयायाआग्रहफारचिकेला ॥
गर्भवतीहीसीताटाकुनि§गुरुजन||तिकडेगेला ॥ ७ ॥

असो, हें आपणास कशास पाहिजे. चला आपण आपल्या जातीच्या चालीप्रमाणें राजद्वारीं जाऊन राजाची स्तुति करूं.

नट—तर मग, राजाची उत्तमप्रकारें स्तुति करण्याचा शुद्ध प्रकार कोणता तो आपणच सांगावा.

सूत्र—मारिषा, ऐकतोस? असें आहे.

### आर्या.

¶वाग्व्यवहारकरावा **अनिंद्यतेलानसेकुठें††थारा ॥
स्त्रीच्यापरिवाणीच्या ‡‡साधुत्वींलोक§§दुर्जनचिसारा ॥८॥

नट—अतिदुर्जन असें कां ह्मणाना? वाणीला स्त्रीची उपमा दिली, ह्यावरून माझ्या मनांत आलें.

---

*विवाह. †यज्ञ. ‡दशरथाच्या घरास. §कौसल्यादि वडील मंडळी. ||ऋष्यशृंगाच्या आश्रमास. ¶भाषणक्रिया. **स्तुत्यपणास. ††आश्रय किंवा ठिकाण. ‡‡चांगुलपणा-[illegible] §§[illegible]

## आर्या.

जन*सापवादसीते विषयींहेंनवलकेवढेंमोटें ॥
रक्षो†गृहवासखरा मानितिजन‡अग्निशुद्धिलाखोटें ॥ ९ ॥

सूत्र०—असें झालें आहे खरें, मला वाटतें जर ही वार्ता राजा रामचंद्राच्या कानावर गेली तर फार वाईट होईल. काय होईल तें होऊ.

नट—असो, ऋषि आणि देवता सर्वप्रकारें कल्याण करतील. ( असें बोलून इकडे तिकडे फिरतो. ) कायहो, ह्यासमयीं रामचंद्रमहाराज कोठें आहेत बरें? ( ऐकल्यासें करून ह्म० ) हां लोक असें ह्मणतात.

## ओंव्या.

§कन्याआणि‖जांवईयांतें ॥ संतोषवावयादोघांतें ॥
जनकराजाअयोध्येतें ॥ आलाहोतासकुटुंब ॥ १० ॥
येथेंचारमासराहोन ॥ परमोत्सवेंघालवूनिदिन ॥
घेऊनरामाचेंअनुमोदन ॥ ¶विदेहनगरापैंगेला ॥ ११ ॥
यास्तवसीतेचेंमानस ॥ स्वस्थनाहींरात्रंदिवस ॥
**बंधुजनाचावियोगतीस ॥ दुःखप्रदझालाअसे ॥ १२ ॥
असतांरामचंद्र††धर्मासनीं ॥ ‡‡वार्ताऐकिलीहेकानीं ॥
सीतासांत्वनकरावयालागुनी ॥ §§अंतःपुरींप्रवेशला ॥ १३ ॥

---

*निंदाकरणारा. †रावणाच्याघरीं राहणें. ‡सीता अग्नींत जाऊन शुद्ध झाली ह्या गोष्टीला. §सीता. ‖रामचंद्र. ¶मिथिला पुरास. **मातापितरांचा. ††सिंहासनीं. ‡‡सीता अस्वस्थ आहे अशी. §§सीतेच्या मंदिरांत.

( असें बोलून दोघे निघून जातात. )

ही पुढील कथेची *प्रस्तावना.

( तदनंतर आसनस्थित रामचंद्र आणि सीता येतात. )

राम०—हे देवी जानकी, सावध हो. असें काय करतेस? ते गुरुजन आपणास सोडून जाण्यास इच्छित नव्हते, परंतु काय करतील. अडचणीमुळें त्यांस जाणें प्राप्त झालें. असें आहे पहा.

### श्लोक.

कीं †अनुष्ठान †नित्यत्व ‡स्वातंत्र्यालागिं मोडितें ॥
§संकटा ||आहिताग्नीची ¶प्रत्यवायें गृहस्थता ॥ १४ ॥

सीता—महाराज, हें मी जाणतें, पण काय करूं, **बंधुजनांचा वियोग दुःख फार देतो. सर्व वडील माणसें एकदांच निघून गेलीं, यामुळें चित्तास स्वस्थता वाटत नाहीं.

राम०—खरेंच आहे. संसारांतील जितके पदार्थ तितके ह्रदय-मर्म भेदणारे आहेत. ह्मणूनच जे विचारशील मुनि आहेत ते सर्वसंगपरित्याग करून अरण्यांत जाऊन स्वस्थ राहतात.

( इतक्यांत कंचुकी येतो.

कंचुकी—हे रामभद्र, ( इतकेंच अर्धें बोलून शंकित होतो. ) अहो महाराज.

राम०—( किंचित् हास्य करून. ) नांव कशासाठीं फिरविलें?

---

*सूचना. †अनुष्ठानाची आवश्यकता. ‡स्वतंत्रपणा ठेवीत नाहीं. §संकट देणारी. ||साग्निकगृहस्थाची. ¶क्रियावैगुण्यानें. **मातापिता सासवांची.

तुह्मी वडिलांच्या पदरच्या मनुष्यांनीं रामभद्र ह्मणावें हा-
च सन्मान मला शोभतो. तर परिपाठप्रमाणेंच बोला-
वें. मनांत कांहीं शंका आणूं नये.

कंचुकी—ऋष्यशृंगमुनीच्या आश्रमापासून अष्टावक्र आला
आहे.

राम०—मग त्याला इकडे येण्यास इतका उशीर कां? लौकर
येऊंद्या.

कंचुकी—आज्ञा महाराज. ( बाहेर जाऊन अष्टावक्रास आंत
पाठवितो. )

अष्टावक्र—( आंत येऊन. ) तुह्मां उभयतांचें कल्याण असो.

राम०—आर्या, मी वंदन करतों. येथें आसनावर बसावें.

सीता—माझाही प्रणाम तुह्मांस असो. सर्व वडील माणसें खु-
शाल आहेत कीं? आणि शांता वन्सें खुशाल आहेत ना?

राम०—आमचा मेव्हणा भगवान् ऋष्यशृंग याचें यज्ञानुष्ठान
कर्म निर्विघ्नपणें यथास्थित चालत आहे कीं? आणि मा-
झी भगिनी शांता आका खुशाल आहेना? आणि ती प-
तीच्या आज्ञेंत राहून त्याचें मन सुप्रसन्न राखीत आहेना?

सीता—तीं आमचें स्मरण करतात काय?

अष्टाव०—( खालीं बसतो. ) तुमचें स्मरण करतात यांत काय
संशय. हे देवी सीते, भगवान् वसिष्ठगुरु ह्यांनीं तुला असें
सांगितलें आहे, कीं,

श्लोक.

विश्वंभराप्रसवलीतु जराजकन्ये ॥
आहेप्रजापतिसमान पिताजि न्ये ॥

---

पृथ्वी. जनकराजा.

तूंसूनजाहालिसन्यावर*पार्थिवाची ॥
ज्याचाअसेकुलगुरू†रविमीतसाची ॥ १५ ॥

ह्यापेक्षां अधिक तें तुला काय द्यावें. आतां आह्मी एवढेंच इच्छितों कीं, तुला ‡वीरपुत्र व्हावा आणि तो आह्मी डोळ्यांनीं पहावा. तर प्रकृतीला जपतजा.

राम०—हा त्यांनीं आह्मांवर अनुग्रहच केला. कां कीं,

**आर्या.**

साधारणसाधूंची धांवे§अर्थाकडेसदावाचा ॥
परिह्याआद्यऋषींच्या वाणिकडे॥अर्थधांवतोसाचा ॥ १५॥

अष्टा०—राजा, तुला अरुंधतीनें, तुझ्या आयांनीं, आणि शांता देवीनें निरनिराळें वारंवार सांगितलें आहे, कीं, जानकी गरोदर आहे, जर तिला एखादा डोहळा झाला तर तो लागलाच अवश्य पूर्ण करावा.

राम०—ही जें सांगते तें मी करीतच आहें.

अष्टा०—बाई जानकी, तुझ्या नणंदेचा पति ऋष्यशृंग यानें तुला सांगितलें आहे कीं, वत्से तूं गर्भिणी आहेस, तुझे दिवस भरत आले ह्मणून तुला इकडे आणिलें नाहीं. याचा तूं खेद करूंनको; आणि तुला कर्मणूक व्हावी ह्मणूनच रामचंद्रास तेथें ठेविलें आहे. आतां तूं मांडीवर पुत्र घेतला आहे असें मी पाहीन.

राम०—( आनंदयुक्त होऊन आणि किंचित् हास्य करून ह्म०) मुने,. वसिष्ठ गुरूंनीं आणखी कांहीं मला आज्ञा केली आहे काय?

---

*श्रेष्ठ राजांची. †सूर्य. ‡पराक्रमी. §होणाऱ्या गोष्टीमागखी वाचानिघते. ॥जशीवाचा निघेल तशीगोष्ट घडते.

अष्टा०—होय, ऐकावें. वसिष्ठांनीं आणखी असें सांगितलें आहे.

आर्या.

आह्मी*जामात्याच्या दीर्घा†सत्रांतगुंतलोंसारे ॥
तूंबालराज्यहिनवें ह्मणुनितुलाएकसांगतोंबारे ॥ १७ ॥
तूंलोक‡रंजनाच्या यत्नींरामाकरूंनको§तोटा ॥
त्यापासुनियशमिळवीं इतरधनाहूनिलाभहा‖मोटा ॥ १८ ॥

राम०—हां असेंकाय? तर गुरु वसिष्ठ आज्ञा करतात तसेंच करीन. पहा.

आर्या.

जनरंजनाहुनिमला स्नेहदयासौख्यहेंअधिकनाहीं ॥
किंबहुनाजानकिही टाकलियामजनसेव्यथाकांहीं ॥ १९ ॥

सीता—ह्या मुळेंच तुह्मांला रघुकुळांत धुरंधर ह्मणतात.

राम०—कोण आहेरे तिकडे? ह्या अष्टावक्राची नीट स्वस्थता करा.

अष्टाव०—(उठून इकडे तिकडे पाहून ह्मणतो.) अहो कुमार लक्ष्मण आला. आतां आपण जावें. (असें बोलून निघून जातो.)

लक्ष्मण—(प्रवेश करून) ज्येष्ठ भ्राताचा जय असो. हे रामचंद्रा, त्या चितार्‍यानें आपल्या आज्ञेप्रमाणें ह्या पटावर रामचरित्राचीं चित्रें काढून आणलीं आहेत. हीं आपण पहावीं.

राम०—वत्सा लक्ष्मणा,हा चित्रपट त्वां वेळेवर आणिला. खिन्न-

---

*ऋष्यशृंगाच्या. †द्वादशवार्षिकयज्ञ समारंभांत. ‡लोकांस बरे वाटण्याच्या. §कमताई आळस. ‖लोकरंजन.

झालेल्या सीतेच्या अंतःकरणास कसें रंजवावें हें तूं चांगलें जाणतोस. बरें आण पाहूं. हें चरित्र कोठपावेतों काढलें आहे?

**लक्ष्मण**—अग्नीमध्यें सीतादेवीची शुद्धि झाली एथपर्यंत आहे.

**राम०**—हर हर काय गोष्ट झाली ही!

## आर्या.

हीजातीनेंशुद्धा हिजलानलगेत*पावनेंअन्यें ॥
तीर्थालाअग्नीला द्यावीकोणेंपवित्रताधन्यें ॥ २० ॥

**लक्ष्मण**—हे देवी, हे यज्ञसंभवे, हे जानकी, कृपाकर. हा तुला यावज्जीव प्रणाम असो.

**राम**—( खिन्न होऊन ह्मणतो.)

## श्लोक.

†कष्टेंजनासकुलजेंअनुरंजवावें ॥
जेंमीदुरुक्तवदलोंतुजतेंनसावें ॥
जेंनित्यसुंदरसुगंधिशिरींधरावें ॥
तेंपुष्पकायचतुरेंचरणेंचुरावें ॥ २१ ॥

**सीता**—असो तें प्राणनाथा, आतां काय त्याचें. तुमचें चरित्र चिताऱ्यानें कसें काय काढलें आहे तें पाहूं या आपण. ( उठून पुढें सरते.)

**लक्ष्म०**—हा चित्रपट, पहावा.

**सीता**—( निरखून पाहते. ) हे वरल्याआंगीं काढले आहेत हे कोण? हे जसे कांय माझ्या प्राणनाथाची स्तुति करीत उभेराहिले आहेत.

---

*पवित्र करणारी. †जनाचें अनुरंजन थोरांस कठिण आहे.

**लक्ष्मण**—हे जानकी, हीं *सरहस्य †जृंभकास्त्रें होत. प्रथम हीं कृशाश्वमुनीपासून विश्वामित्रऋषीस प्राप्त झालीं, त्यानें ताटकावधप्रसंगीं आमच्या रामचंद्रास कृपाकरून प्रसाद ह्मणून दिलीं.

**राम०**—हे जानकी, ह्या दिव्यास्त्रांस वंदन कर. हीं,

**ओंव्या.**

पूर्वीब्रह्मादिकअतिहर्षें ॥ ‡ब्रह्महिताच्याउत्कर्षें ॥
तपकरितांलोटलींवर्षें ॥ सहस्रांचींसहस्र ॥ २२ ॥
अनंतकाळतपाच्याअंतीं ॥ पुराणमुनीपाहतीचित्तीं ॥
हींचदेखिलींअस्त्रमूर्ती ॥ तपोमयस्वतेजें ॥ २३ ॥

**सीता**—ह्या अस्त्रदेवतांस माझा नमस्कार असो.

**राम०**—आतां हीं दिव्यास्त्रें सर्वप्रकारें तुझ्या संततीस उपतिष्ठतील.

**सीता**—हा मजवर अनुग्रहच झाला.

**लक्ष्म०**—आतां येथून पुढें हा मिथिलानगरींतील वृत्तांत आहे.

**सीता**—( हर्षपावून. ) अहो! नवीन फुललेल्या नलिकमलासारखा ज्याचा श्यामवर्ण आहे, स्निग्ध कोमल आणि §मांसल असा ज्याचा देह आहे, ‖मामाजी विस्मित होऊन ज्याकडे प्रेमानें पाहत आहेत, ज्यानें लीलेंकरून शिवधनुष्य भंगिलें आहे, आणि ¶काकपक्षांनीं ज्याच्या मुखास फारच शोभा आली आहे, असा हा माझा प्राणनाथ येथें लिहिला आहे. असें दिसतें!

---

*मंत्रविधानसहित. †जृंभकनामक अस्त्रें. ‡ब्रह्मप्राप्तीच्या. §पुष्ट. ‖दशरथ. ¶झुलपांनीं.

लक्ष्मण—हे आर्ये जानकी, इकडे पहा.

दिंडी.

वसिष्ठादिकपातलेघराव्याही ॥
तयांपूजीतवसात*लवलाहीं ॥
पहागौतमव्हाशतानंदतोही ॥
जनकरायाचाउपाध्यायपाहीं ॥ २४ ॥

राम०—प्रिये, हें पाहिलेंना? हें पहावयाजोगें आहे.

आर्या.

कींजनकरघुकुलांचा कोणासंबंधतोप्रियअसेना ॥
जेथेंदेताघेता कौशिकमुनिज्यांतभेदगवसेना ॥ २५ ॥

सीता—हे तुह्मी चवघेही भाऊ त्या काळीं केशखंडनरूप मंगलविधि संपादून विवाहदीक्षा घेऊन बसलां आहां. आणि मीही त्याचकाळीं त्याचठिकाणीं जाणों आहें असें मला वाटतें.

राम०—मलाही असेंच वाटतें.

श्लोक.

वाटेमला†समयसुंदरितो†असेहा ॥
हस्तेंतुझ्यापुरविलीमम‡मानसेहा ॥
शोभेतसाचिधृतकंकण§पाणितोकीं ॥
भासेमह्मोत्सवचिहाधृतमूर्तिलोकीं ॥ २६ ॥

लक्ष्म०—ही तूं जानकी, ही आर्या ‖मांडवी, आणि ही ¶वधूश्रुतकीर्ति.

---

*आदरानें. †पहिला विवाहाचा समय तोचहा. ‡मनांतील इच्छा. §हस्ततुझा. ‖भरताची स्त्री. ¶शत्रुघ्नाची स्त्री.

सीता—लक्ष्मण भावोजी, आणि ही *चवथी कोणहो?

लक्ष्म०—( लज्जित होऊन किंचित् हास्यकरून मनांत ह्मणतो.) काय ही जानकी, ऊर्मिलेविषयीं मला विचारते. असो, आतां दुसरें कांहीं दाखवितों. ( उघडपणें. ) हे जानकी, तें कशाला पाहिजे. पुढें पहावयाचें तें पहा. हा भगवान् भार्गव परशुराम पाहिला?

सीता—( अंगसंकोच करून.) ह्याला पाहून मला भय वाटतें.

राम—हे ऋषे तुला नमस्कार असो.

लक्ष्मण—हे जानकी, हाच भार्गवराम आमच्या रामचंद्रानें (इतकें अर्धें बोलतांच.)

राम०—( तिरस्कार करून. ) अरे तें असूंदे. अजून पुष्कळ पहावयाचें आहे. पुढें दाखीव.

सीता—( प्रीतीनें बहुमानपूर्वक रामाकडे पाहून ह्म०) प्राणनाथा, ह्या विनयगुणानें तुह्मी फारच शोभतां!

लक्ष्मण—आतां हे आपण अयोध्येस आलों, पहा.

राम—( डोळ्यांस पाणी आणून.) हाय हाय, ते दिवस वारंवार आठवतात.

**साकी.**

असतां†तातअह्मीजैंनूतनदार‡परिग्रहकेले ॥
चिंतिति§मातासततअह्मां॥तेदिवसआमुचेगेले ॥ २७ ॥

(मनांत.) ही जानकीही त्यावेळेस.

**दिंड्या.**

कायवर्णूंलावण्यजानकीचें ॥

*लक्ष्मणस्त्री. †दशरथराजा. ‡विवाह. §कौसल्यादिक.
॥ते आनंदाचे.

कुटिल*कुंतलशोभतीमस्तकींचे ॥
कळ्याकुंदाच्यातसेदंतजींचे ॥
मुग्धहंसणेंपाहणेंबाळपणचें ॥ २८ ॥
लाजवीजीस्वप्रभें†चंद्रिकेतें ॥
दाखवीजीतैंसहज‡विभ्रमातें ॥
अशापाहोनी§मधुरअवयवांतें ॥
मनींमातामानितीकौतुकातें ॥ २९ ॥

**लक्ष्मण**—ही मंथरादासी पाहिली काय?

**राम०**—( उत्तर न करितां दुसरीकडे दृष्टि नेऊन ह्म०) अगे जानकी, हें पहा.

## आर्या.

जोशृंगवेरगनरीं हिंगणतरुतोचह्यामलागमतो ॥
जेथेंनिषादपतिशीं ‖स्निग्धाशींजाहलासमागमतो॥ ३०

**लक्ष्मण०**—( हांसून मनांत ह्म० ) कायहो मध्यममाता केकेयी हिचीगोष्ट रामानें अगदींच गाळली!

**सीता०**—प्राणनाथा, तुह्मीं ह्याचठिकाणीं जटा वळल्या, नाहीं बरें?

**लक्ष्म०**—शिवशिव काय सांगावें!

## श्लोक,

टाकूनिपुत्रावरिराज्यसारें ॥
¶जें**वृद्धइक्ष्वाकुनिसद्विचारें ॥
तेंघेतलेंबाळपणींचरामें ॥
अरण्यवास††व्रतपूर्णकामें ॥ ३१ ॥

*केश. †चांदण्यातें. ‡साहजिकलीलेतें. §मनोहर. ‖स्नेहयुक्त. ¶जें व्रत. **इक्ष्वाकु कुलांतील वृद्ध राजांनीं. ††नियम.

सीता—ही भगवती भागीरथी. हिचें उदक किती स्वच्छ आणि पवित्र हें! माते तुला माझा नमस्कार असो.

राम०—हे रघुकुलदेवते गंगे, तुला नमस्कार असो.

## ओंव्या.

सगरें*अश्वमेधमांडिला ॥ भूमीवरीअश्वसोडिला ॥
तो†अमरनाथेंहिरोनिनेला ॥ निजपदजाईलयाभयें ॥ ३२
तैंअश्वसोधावयाधांवले ॥ ज्यांनींपृथ्वीचेभागभेदिले ॥
ते‡कपिलतेजेंभस्मझाले ॥ §स्वपित्याचेपूर्वज ॥ ३३ ॥
ऐकोनियांऐशीमात ॥ ‖खडतरतपकरीभगीरथ ॥
दुःखेंसोशिलींअगणित ॥ तुझ्याप्रसादाकारणें ॥ ३४ ॥
चिर¶दग्धांचियादेहांवरी ॥ मातेपडतांतुझीलहरी ॥
तुझ्याप्रसादेंउद्धारकरी ॥ पूर्वजांचाभगीरथ ॥ ३५ ॥

अशी ती तूं आमची जननी होस, आणि ही सीता तुझी सून होय. हिचें कल्याण अरुंधतीप्रमाणें सदा इच्छीत जा.

लक्ष्म०—आर्या, स्मरण आहेना? भरद्वाजऋषींनीं सांगितलेला चित्रकूठ पर्वताच्या वाटेवरचा यमुनानदीच्या कांठीं जो श्यामनामक मोठा वटवृक्ष होतातो हा.

सीता—प्राणनाथा, ह्या स्थलाचें स्मरण आपणास आहे कीं?

राम०—सखे, मी कसा विसरेन बरें? ज्या ठिकाणीं.

## श्लोक.

**अलसलुलित,मार्गीचालतांश्रांतझालीं ॥

---

*यज्ञ. †इंद्रानें. ‡कपिलमहामुनीच्यादृष्टितेजानें.
§सगराचे. ‖फारकठिण. ¶बहुकाळ दग्ध होऊन पडलेले.
**आळसानें विकळ.

दृढतर*परिरंभादेउनीसांवरीलीं ॥
मृदुलकमलतंतूतुल्यहोतां†त्वदंगें ॥
पडुनिग्हृदयिंमाझ्यावेतलीझोंपसंगें ॥ ३६ ॥

**लक्ष्मण**—एथून विंध्यारण्यास आरंभ झाला. येथेंच विराध राक्षसानें आपणास अडविलें होतें.

**सीता**—पुरे पुरे, नको हें पाहणें. आतां प्रभूनें आपले हातांत तालपत्राचें छत्र घेऊन दक्षिणारण्यांत प्रवेश केला, तेंच आपण पाहूं.

**राम०**—हीं वनें कोणती समजलींना?

**श्लोक.**

जेथेंमुनीनदितटींजनजेंवि‡गेहीं ॥
वृक्षाश्रयेंवसतितींचतपोवनेंहीं ॥
§नीवारमुष्टिभरि||पाचितजेथहोती ॥
सत्कारुनीअतिथिआपणसेविताती ॥ ३७ ॥

**लक्ष्मण**—पहा येथें वृक्षांच्या दाटींतून गोदावरीनदीचा प्रवाह चालला आहे, तेणेंकरून ज्याच्या गुहा नादयुक्त होत आहेत, असा आणि ज्यास निरंतर सजलमेघ आश्रयून राहिल्यामुळें ज्याची नीलकांति वृद्धिंगत झाली आहे, असा हा जनस्थानामधला प्रस्रवणनामापर्वत.

**राम०**—सीते, हा पर्वत तुझ्या ओळखीचा असावा.

**पद.**

आठवतेंतुजकायसीते ॥ ध्रुवपद )
¶ह्याचगिरीवरी,आपणहोतों ॥ पाहत**निर्झर

---

* आलिंगनास. † तुझे अवयव. ‡ घरीं. § तृणधान्य.
|| शिजलेलें. ¶ प्रस्रवणनामक पर्वतावर. ** जलप्रवाह.

शोभासीते ॥ आठवतेंतुजकायसीते ॥ १ ॥
अपुलेंमानसें,स्वस्थकराया ॥ लक्ष्मणफार-
झटेगेसीते ॥ आठवतेंतुजकायसीते ॥ २ ॥
दिवससुखानें,नेलेयेथें ॥ संगतिनें*अनु-
ज्याच्यासीते ॥ आठवतेंतुजकायसीते ॥ ३ ॥
ह्याश्रीगोदा,वरिचेंकेलें ॥ स्नानेंपानेंसेवन-
सीते ॥ आठवतेंतुजकायसीते ॥ ४ ॥
गोदावरिच्या,तीरींआपण ॥ केलेफार†विहा-
रसीते ॥ आठवतेंतुजकायसीते ॥ ५ ॥

दिंड्या.

एकेदिवशींआपणएकेशयनीं ॥
एकमेकांसीकरीआलिंगोनी ॥
कांहिंकांहींबोलतांमंदवचनीं ॥
आंगिउठलेरोमांचथरारोनी ॥ ३८ ॥
एकमेकांशींलावुनियांआंगा ॥
गालगालाशींभूजभुजासंगा ॥
काढितांहीगोष्टिच्याप्रसंगा ॥
मनींनाहींआणिलें‡क्रमभंगा ॥ ३९ ॥
असेंहोतांआनंदउभयतातें॥
रात्रसरलीबोलतांबोलतांतें ॥
नाहिंझालेंठावकेंआपणातें ॥
कायआठवतेंसांगसखेतूतें ॥ ४० ॥

लक्ष्मण—ही पंचवटी, आणि तिजमध्यें पहा ही शूर्पणखा.

---

* बंधुलक्ष्मणह्याच्या. † क्रीडा. ‡ गोष्टींच्या क्रमाचा भंग.

सीता—हाय हाय, प्राणनाथा, आतां हीच तुमची माझी भेटनव्हे?

राम०—अगेभित्रे, हें चित्र आहे. आतांतें वियोगाचें भय मनांत आणूंनको.

सीता—कसेंहीअसो, पण दुर्जन आहेत ते दुःख देतात.

राम०—हरहर, ही पंचवटींतली गोष्ट आतां वर्तमानकाळीं होत-आहे असें वाटतें.

लक्ष्मण— ( आपणासीं बोलतो. )

साकया.

कनकमृगाचें*छद्मकरुनिजेंकर्म†राक्षसेंकेलें ॥
‡सद्यःकृतसेंदुःखदहोतेंजरितेंगेलेंगतलें ॥ ४१ ॥
§शून्यजनस्थानींजींकेलींप्रभुनें‖विलापचरितें ॥
तींऐकुनिपाषाणहिरडतीवज्रन्हृदयहीफुटतें ॥ ४२ ॥

सीता—( डोळ्यांस पाणी आणून मनांत ह्मणते. ) हे रघुकुल-भूषणा, प्राणनाथा, माझ्याकरतां तुला इतके क्लेश झालेना?

लक्ष्म०— ( रामचंद्राच्या नेत्रांतून अश्रुनिघतात असें पाहून त्यास ह्मणतो. ) महाराज हेंकाय?

दिंड्या.

¶बाष्पवारीचेबिंदुगळताती ॥
**त्रुटितमुक्तासरजेंविओघळती ॥
पडुनिधाराचहुंकडेपसरताती ॥
पहासांचविलेंतळेंभूईवरती ॥ ४३ ॥
जरीरोधियले††वेगतुंवांन्वित्तीं ॥

* मिष. † मारीचराक्षसानें. ‡ आतांचकेलेंसें. § निर्जन. ‖ विलापकरण्यें.
¶ नेत्रोदकाचे. ** तुटलेल्याहारांतून जशींमोतेंओघळतात.
†† दुःखाचेवेग.

तरीदाटुनिबाहेरनीघताती ॥
ओष्ठनासापुटमंदकांपताती ॥
लोकतेणेंअनुमानकरीताती ॥ ४४ ॥

राम०—वत्सा लक्ष्मणा, काय सांगूं?

**श्लोक.**

त्याकाळींजो*प्रियसखिवियोगेंचिजन्मासआला ॥
आशेनेंजो†शमनविधिच्याक्रूरहीं‡सह्यझाला ॥
तोदुःखाग्नीमजअनुभवाआज§दुर्वारयेतो ॥
‖ह्रन्मर्माचा‖व्रणकिणतसा¶वेदनाफारदेतो ॥ ४५ ॥

सीता—हाय हाय, ह्याकाळीं प्राणपतीच्यावियोगानें दुःखित झालें असें मी आपणास पाहतें.

लक्ष्मण—(मनांत ह्मणतो.) असो आतां ह्या उभयतांस दुसरें कांहीं दाखवावें. (चित्रपटाकडे पाहून उघडपणें ह्म०) हा मन्वंतरींचा पुरातन गृध्रराज जटायो, आपणास वडिलाप्रमाणें मान्य. ह्यानें ह्याच ठिकाणीं पराक्रम केला, रावणापासून सीता सोडविण्यास.

सीता—हा ताता **गृध्रराजा, त्वां ††अपत्य स्नेह शेवटास नेला खरा.

रामचं०—हा ताता, हा कश्यपसुता, हा गृध्रराजा, जटायो, तुझ्यासारख्या महान् ‡‡तीर्थरूप साधूचा लाभ आतां पुनः कोठचा होणार?

---

* सीतावियोगें. † शमनोपायाच्या. ‡ सोसायाजोगा. § दुःसह. ‖ ह्रदयांतील व्रणाचा घट्टा. ¶ दुःख. ** जटायो. †† मुलावरची ममता. ‡‡ पवित्र.

लक्ष्मण—पहा, हा जनस्थानाच्या पश्चिमेकडचा चित्रकुंजवान्-नामक दंडकारण्याचा भाग. येथेंच कबंध राक्षस राहत होता. हें ऋष्यमूकपर्वतावरील मतंगऋषींचें आश्रम-स्थान. आणि हें येथें श्रवणानामक सिद्धशबरीचें स्थान. ह्याच्या पुढेंच हें पंपासरोवर.

सीता—हां, खरेंच, ह्याच ठिकाणीं प्रभूनें धैर्य सोडून कंठमोकळा करून रुदन केलें नव्हे?

राम०—गे जानकी, हें पंपासरोवर फार रमणीय आहे.

श्लोक.

येथेंजीं*मदकलहंस*पक्षवातें ॥
कंपातेंधरितिस†नालतींचमातें ॥
‡बाष्पांच्यापरि§पतनोद्गमांतरालीं ॥
पंपेचींकमलवनें||सुदृष्टझालीं ॥ ४६ ॥

लक्ष्म०—हा पहा ¶आर्य हनूमान्.

सीता—हाचतो, चिरकाल दुःखांत पडलेल्या ह्या जीवाचा उद्धार करण्याविषयीं प्रयास करणारा भाग्यशाली मारुति.

राम०—हा तसाच आहे खरा.

आर्या.

तोहासुतअंजनिचा प्रतापशालीअसानसेअन्य ॥
ज्याच्याभुजवीर्यबळें आह्मांसहजाहलींजगेंधन्य ॥ ४७ ॥

सीता—वत्सा, ज्यावर प्रफुल्लित कदंबवृक्ष पाहून मयूर नृत्य करीत आहेत असाजो हा पर्वत दिसतो ह्याचेंनांव कायब-रें? तेथें वृक्षाखालीं बसलेला ज्याचीमुखश्री म्लान झाली

---

* मत्तकलहंस ह्यांच्या पंखांच्यावाऱ्यानें. † देठांसुद्धां. ‡ अश्रूंच्या. § पडणें निघणें ह्याच्या मधल्यावेळेंत. || पाहण्यांत आलीं. ¶ श्रेष्ठ.

आहे, व जो सामर्थ्यवैभवानें मात्र शोभणारा, आणि जो मुहूर्तमात्र मूर्छित झाल्यामुळें त्वां रुदन करीत सांवरून धरिला असा हा प्राणनाथ येथें काढला आहे. असें दिसतें.

**लक्ष्मण**—सांगतों ऐक.

### श्लोक.

तोहाआहे*कुसुमित*गिरीमाल्यवान्नामज्याला ॥
ज्याच्या†शृंगींससतवसतेनूतना‡मेघमाला ॥

**राम०**—( हें ऐकून ह्म० )

वत्साआतां§विरमनपुढेंपाहवे,तोच‖योग ॥
आलावाटेफिरुनिमजतोजानकीचावियोग ॥ ४८ ॥

**लक्ष्मण**—ह्यापुढें आपलीं, तशींच मोठमोठ्या वानरांचीं आणि राक्षसांचीं आश्चर्यकारक अशीं कर्मे पुष्कळ पहावयाजोगीं आहेत. परंतु ही जानकी पाहतां पाहतां थकली आहे, ह्यास्तव मी विनंती करितों कीं, आज आतां पाहणें पुरें करावें.

**सीता**—प्राणनाथा, ह्या चित्रदर्शनानें मला एक डोहळा झाला आहे. ह्यासाठीं माझी एक प्रार्थना आपणास आहे.

**राम०**—सखे, प्रार्थना असें कां ह्मणतेस. कायती आज्ञा कर ह्मणजे झालें.

**सीता**—असें कसें होईल, म्यां आपणास प्रार्थनाच करावी. ती हीच कीं, गंभीर आणि रमणीय अशा ¶वनराजींत जाऊन पुन्हा विहार करावा, आणि भागीरथीच्या पवित्र शीतळ उदकांत स्नानें करावीं असें मला वाटतें.

---

* फुलझाडांनीं युक्त पर्वत. † शिखरावर. ‡ मेघसमूह. § थांब. ‖ प्रसंग. ¶ वृक्षयुक्त अरण्यांत.

राम०—फार चांगलें आहे—वत्सा लक्ष्मणा.

लक्ष्मण—हा मी जवळच आहें. काय आज्ञा?

राम०—अरे, जानकीस डोहळा झाला असतां तो तत्काळ पुरवावा अशी गुरुजनांची नुकतीच आज्ञा झाली आहे, तर जानकीस सांप्रत *वनविहाराचा डोहळा झाला आहे, तो पुरविला पाहिजे. ह्यासाठीं †अस्खलित चालणारा आणि ज्यांत बसलें असतां सुख होईल असा एक रथ सिद्ध करून लौकर घेऊन ये.

लक्ष्मण—आज्ञा महाराज. हा आणलारथ ह्मणा. ( असें ह्मणून निघून जातो. )

सीता—प्राणनाथ, आपणही तिकडे चलावें.

राम० — अगे कठिणत्हृदये जानकी, हें कायमला सांगावें लागतें? आल्याशिवाय माझ्यानें राहवेल असें तुला वाटतें कायगे?

सीता—तर मग माझें फारच प्रिय होईल.

राम०—हे प्राणसखी जानकी, लक्ष्मण रथ आणी तोंपर्यंत दोनघटका आपण खिडकीपाशीं वाऱ्यावर बसूं.

सीता—होहो असेंच करावें. चित्रें पाहण्याच्या परिश्रमामुळें झोंपेनें मला फार घेरलें आहे.

राम०—तर मग ये आणि माझ्या मांडीवर उसें ठेवून अमळ स्वस्थ झोंप घे. अथवा.

## आर्या.

घालींगळ्यांतमाझ्या सखिहा‡श्रमघर्मबिंदुयुतगार ॥

---

* वनक्रीडेचा. † अडखळल्यावांचून.

‡ श्रमघर्माच्या बिंदूंनीं युक्त. अतएवमार थंड असा तुझाबाहू.

बाहुतुझाचंद्रकर *स्राविगमोचंद्रकांतमणिहार ॥ ४९ ॥

राम०—( सीतेचा बाहू आपल्या कंठावर ठेवून अतिशयित आनंद पावून ह्मणतो. ) प्रिये, मला असें हें काय होतें बरें.

श्लोक.

कळेनाहेंमातेंसकळसुखकींदुःखचिअसे ॥
असेनिद्राकिंवामद,†विषचढे,मोहचिवसे ॥
तुझ्यास्पर्शीस्पर्शीविकल‡करितोइंद्रिय§गणा ॥
विकार||प्राणांतेंभ्रमहिअणिदेई¶स्थिरपणा ॥ ५० ॥

सीता—( हास्य करून ह्मणते. ) तुमची कृपा आणि प्रीति मजवर पूर्ण आहे, त्याचें हें लक्षण. दुसरें कांहीं नाहीं.

राम०—प्राणसखे, कितीगे तुझें मधुरभाषण हें!

श्लोक.

**म्लानासंजीव††कुसुमासंफुलीवणारीं ॥
सर्वेंद्रियांससुखवूनहिमोहणारीं ॥
ऐसींतुझींसुवचनें‡‡कमलायताक्षी ॥
कर्णासगोडगमतीमनयाससाक्षी ॥ ५१ ॥

सीता—अहो प्रियंवद, या, आतां आपण शयन करूं. ( शयनार्थ कांहीं साधन इकडे तिकडे पाहते. )

राम०—दुसरें सोधावयास कशास पाहिजे?

---

* चंद्रकिरणांनीं स्रवणारा चंद्रकांतमण्याचा हारच वाटो. † मदचढला कीं विषचढलें. ‡ व्यापारहीन. § इंद्रियसमुदायास || ऱ्हदयास विलक्षण विकार झालातो. ¶ देहभान. ** म्लान, सुकलें †† जीवरूपपुष्प. ‡‡ कमलपत्राक्षी.

### श्लोक.

लग्नापासुन वर्तमान समयापर्यंत गेहीं वनीं ॥
रात्रींवा दिवसास हीशिशुपणीं तैसा पुन्हा यौवनीं ॥
निद्रेला तव राम बाहु च उशी हा सर्वदा जाहला ॥
जाग्रन्स्वप्नसुषुप्तियांत न दुजा स्पर्शा प्रियेया जला ॥ ५२ ॥

सीता—खरें आहे. ( असें ह्मणून रामाच्या बाहूवर मस्तक ठेवून निजते. ) आहे आहे प्राणप्रिया हेंच आहे.
( असें चावळत झोंपीं जाते. )

राम०—काय ही प्रियसखी माझ्या आंगावर झोंपीं गेली!
( तिजकडे पाहून. )

### श्लोक.

गृहाची ही शोभा तसि* अमृतवर्ती च नयना ॥
असे ही† श्रीखंडापरिस सुखद स्पर्श‡ ललना ॥
हिचा कंठीं बाहू§ मृदु|| शिशिर¶ मुक्तासुसर हा ॥
हिचें सारें आहे प्रिय परि न साहे चि विरहा ॥ ५३ ॥

( इतक्यांत द्वारपालिका येते. )

द्वारपालिका—महाराज, तो ** आला.

राम०—अगे कोण?

द्वारपा०—महाराजांचा परिचारक दुर्मुख.

राम०—( मनांत ह्म० ) हां अंतःपुरचारी दुर्मुख काय? तो मीं लोकवार्ता जाणण्यासाठीं पाठविला होता खरा. तो आला असेल. मी भलतेंच समजलों. ( उघडपणें. ) बरें त्याला आंत येऊंदे.

---

* अमृताची सात शलाका. † चंदनापेक्षां. ‡ सुंदरी. § मऊ. || शीतळ. ¶ मोत्यांचा हार. ** पूर्वोक्त विरह असी भ्रांति होते.

( द्वारपालिका जाते. आणि दुर्मुख येतो. )

दुर्मुख—( आपणाशीं बोलतो. ) हायहाय, सीतादेवीविषयीचा अनिर्वाच्य जनापवाद महाराजांस कसा सांगूं? अथवा, मजमंदभाग्याचें कामच हें. नसांगून कायकरावें! सांगणें कपाळास आलें खरें.

सीता—( झोंपेंत चावळते. हे प्राणप्रिया. तूं कोठें आहेस?

राम०—अहो मला दुःखशोक देणारी जी विरहव्यथा तीच चित्रदर्शनानें ह्या माझ्या प्रियसखीस झाली ह्मणून ही झोंपेंत असें बरळतेकाय? ( प्रीतीनें सीतेच्या आंगावरून हात फिरवून ह्मणतो. )

ओंव्या.

तीन्ही*अवस्थांमाजीसाचें ॥ झालें†अद्वैतसुखदुःखाचें ॥
एकरूपउभयतांचें ॥ जेंस्नेहाशींअनुरूप ॥ ५४ ॥
जेंहृदयाविश्रांतिस्थान ॥ जेथेंप्रेमरसाचेंमान ॥
कधींहीहोईनान्यून ॥ ‡वयोभेदझालातरी ॥ ५५ ॥
मध्येंआलिया§आवरण ॥ काळेंकरूनत्याचेंनिवारण ॥
होतांपहिल्यापरीपूर्ण ॥ स्नेहसर्वींजेंराहिलें ॥ ५६ ॥
ऐशियासुभाग्यसाली ॥ असावीसर्वदा‖भद्रराशी ॥
कोणतयाच्याअभद्राशी ॥ जनमानसींचिंतील ॥ ५७ ॥

दुर्मुख— ( जवळ जाऊन. ) महाराजांचा जयअसो.

राम०—आज नवीनवार्ता कोणती ऐकिली सांग.

दुर्मुख—नगरांतील व देशांतील सर्वलोक महाराजांची स्तुतिकरतात, कीं ह्या रामचंद्रानें दशरथराजाचें विस्मरण पाडलें.

---

* जाग्रतिस्वप्नसुषुप्ति. † साम्य. ‡ बाल्यतारुण्यादि. § चित्त. ‖ कल्याण

राम०—हा उगीच अर्थवाद आहे. ह्या स्तुतींत कांहीं नाहीं लोकांच्या बोलण्यांत मजविषयीं कांहीं दोषोक्ति निघाली असली तर तीसांग. कांकीं, तिचें परिमार्जन केलें पाहिजे.

दुर्मुख—( डोळ्यांसपाणीं आणून ) आज्ञा होते त्यापक्षीं सांगतों, ऐकावें. ( कानाजवळ तोंड नेऊन. ) याप्रमाणें वर्तमान आहे.

राम०—हायहाय. ( असेंबोलून मूर्छा पावतो. )

दुर्मुख—महाराज; सावध व्हा. अविचारी लोकांच्या बोलण्यावर जाऊंनका.

राम०— सावध होऊन ह्मणतो.

साकया.

विदेहीलाकसातरीं परसदनींनिवासघडला ॥
होइलदूषणजनांतहामजधाकमानसींपडला ॥ ५८ ॥
त्यादोषाच्यापरिहारार्थ्यांअद्भुतउपायकेले ॥
दुर्दैवानेंमाझ्यासारितेविलयाप्रतिनेले ॥ ५९ ॥
कींतेंदूषणजनांतसाऱ्यातिणेंविस्तृतकेलें ॥
पिसाळल्याश्वानाचेंविषसेंपुनरपिकसेंउदेलें ॥ ६० ॥
कायकरावेंनसुचेमजलाआतांउपायकांहीं ॥
जीवित्वालाधिक्कारअसोमरतिहरवीनाहीं ॥ ६१ ॥

( विचारकरून करुणायुक्तहोऊन ह्मणतो. )

अथवा दुसरेंकाय ? हेंच केलेंपाहिजे

आर्या.

जनरंजनकेसेंही साधावेंजिसाधु संतानें ॥

स्तुतिवाद. सीतेला. लवणाच्या ... त्यर्थझालें. दुर्दैवानें घोरातें.

माझाविमवेदी सोडुनि वेसाधिलेंचि मनातें ॥ ६२ ॥

वसिष्ठगुरूंनी हेंच सांगून पाठविलें आहेना ? आणखी सांगतों, असें जर मी न करीन तर.

श्लोक.

अजवरिभुवनींजेसूर्यवंशोद्भवांनी ॥
विमलचरितकेलेंलोकमान्यानृपांनी ॥
जनमुखिमलयोगेंडागलागेलत्यातें ॥
करितरिअखिलोकींधिक्‌अधन्यासमातें ॥ ६३ ॥

हा प्रियसखी जानकी, जी तूं यज्ञवेदीपासून उत्पन्न होणारी, आपल्याजन्मानें पृथ्वीस पवित्र करणारी, निमिजनक वंशास आनंद देणारी, पावक, वसिष्ठ, अरुंधती ह्यांनीं प्रशंसावया जोगें- शीलबाळगणारी, सर्वप्रकारें मजवर प्राण ठेवणारी, वनवासांत मलासुख देणारी, आणि थोडें असून गोड बोलणारी, त्यातुझा ह्या प्रकारचा परिणाम कसागे झाला ! हायहाय !.

ओंव्या.

तुझ्यामुळेंहींजगतें ॥ झालींअसतीपुण्यवंतें ।
तुजविषयींजनमाचींउक्तें ॥ अभद्रकेशींनिवाली ॥ ६४ ॥
तुझियायोगेंझालेंसनाथ ॥ सर्वलोकअसतीस्वस्थ ॥
तीतूंहीऊनअनाथ ॥ आतांचिविपत्तीभोगिशीलकीं ॥ ६५ ॥

अरे दुर्मुखा, जा लक्ष्मणास जाऊन सांग कीं; तुझा नवीन राजा जो राम तो तुला आज्ञा करितो. (कानांत) याचा प्रमाणें लौकर कर.

दुर्मुख—महाराज, हें काम झालें असें समजा. ( जातो. )

राम—आतां मी सर्व लोकांत निंद्य, अशुद्ध व दुराचारी झालों, कारण माझ्या आश्रयानें विश्वासानें असणारी जी मृगी तिला

होऊन निघाली, जिच्या उदरांत रघुवंशाचा अंकुर असा पवित्र गर्भ स्फुरण पावत आहे, त्या देवीविषयीं दुर्जनांच्या *असमंजस भाषणावरून आपण थोरांनीं हें अयोग्य कर्म आरंभिलें. हें नीट वाटत नाहीं.

राम०—शिवशिव, अरे लोकांस दुर्जन असें कां ह्मणतोस?

श्लोक.

इक्ष्वाकुवंशांतजनास†भाळ ॥
बोलावयाकारणहेंचझालें ॥
शुध्यर्थजे‡अद्भुतकर्मकेलें ॥
तेंकोणमानीलखरें§दुरेलें ॥ ६६ ॥

यासाठीं तूं जा आणि लक्ष्मणाला याप्रमाणें सांग.

दुर्मुख—हायरे देवा, हा देवी जानकी, आतां तुझी काय गती होईल?

(असें बोलून निघूनजातो.)

राम०—हाय हाय, आज मी केवढा क्रूरकर्मा आणि घातकी झालों हा. पहा.

श्लोक.

॥बाल्यापासुनिपोशिलीप्रियसखीवेऊनिच्याच्या¶प्रिया ॥
अन्यालाजरिभिन्नदेहदिसतीजीएकचित्ता**प्रिया ॥
तीतें††छद्मकरूनिआजसहसामी‡‡मृत्युलादेतसें ॥
जैसाखाटिकपाळल्याबकरिचाकापीमळाहें§§तसें ॥ ६७ ॥

---

*अविचाराचे भाषण. †माझ्या दुर्दैवानें. ‡अग्निशुध्यादिक. §अतिदूरचें. ||लहानपणापासून. ¶प्रियपदार्थ. **स्त्री. ††कपटानें ‡‡काळाला. §§दुष्कर्म तसेंच.

तस्मात् स्पर्शकरण्यास अयोग्य असा मी महापातकी ह्या देवीला आपल्यास्पर्शानें दूषित कशाला करूं? ( असें ह्मणून सीतेचा मस्तक हळूच उचलून आपलाहात काढून घेतो. आणि ह्मणतो. )

**आर्या.**

गेमीअपूर्वकर्म चांडालच्सिोडमजकळेनतुला ॥
शिवलीसचंदनाच्या भ्रांतीनें* दुर्विपाकविषतरुला ॥ ६८ ॥

**पद. ६९**

सोडसोडसोडअतांजानकीमला ॥ ध्रु० ॥
आजकर्मचांडाळह्याचजाहला ॥ नसेल-
आजवरीअसाकोणिपाहिला ॥ सोड० ॥ १ ॥
भ्रांतिधरुनिचंदनाचीशीवलिसमला ॥
स्पष्टदुष्टपरिणामींविषतरुतुला ॥ सोड० ॥ २ ॥
मजवरिविश्वासतुवांफारठेविला ॥ मीच
आजखरातुझागळाकापिला ॥ सोड० ॥ ३ ॥

( उभारहून ह्मणतो. )

**पद ७०.**

नकळेहोइलगतिकैशी ॥ आतांकायकरूं ॥ ध्रु० ॥
विपरितकाळाचेंलक्षण ॥ झालाजीव†लोकनिर्वाण ॥
सरलेंजगण्यचेंकारण ॥ आतांप्राणकेंविधरूं ॥ १ ॥
भासेमजलाजगहें‡शून्य ॥ दिसतेंजैसें§जीर्णअरण्य ॥
सरलेंमाझेंसर्वहिपुण्य ॥ होउनि॥वन्यकायफिरूं ॥ २ ॥
पूर्वीमानवलासंसार ॥ वाटेआतांतोचअसार ॥
शरिरींहोतीकष्टहिफार ॥ नाहिंअधारकुठेंशिरूं ॥ ३ ॥

---

*दुष्टपरिणामी. †जीविताचा अंत. ‡ओस. §ओसाडरान.
॥वनवासी.

सीतेवांचुनिमजलाक्षण ॥ होतिलकल्पासमान जाण ॥
वाटतिसोडावेहेप्राण ॥ खोंचुनिबाणकायमरूं ॥ ४ ॥
नकळेहोइलगतिकैशी ॥ आतांकायकरूं ॥
अथवा प्राण सोडूं ह्मटलेंतरी जावयाचे नाहींत.

आर्या.

भोगावयासदुःखें देवेंचैतन्यठेविलेंरामीं ॥
तेंसुदृढप्राणांहीं खिळिलेंऐसेंचमानितोंहामी ॥ ७१ ॥

( देवतागुरु इत्यादिकांचीप्रार्थनाकरतो. )

ओंव्या.

हाभगवंताविश्वामित्रा ॥ हावसिष्ठासद्गुणपात्रा ॥
हाश्री*पावकापवित्रा ॥ धांवातुह्मीयावेळीं ॥ ७२ ॥
हामातेअरुंधती ॥ सीताजननिये† वसुमती ॥
हात्रिजटमहामती ॥ कृपाकरावीयावेळीं ॥ ७३ ॥
हाबिभीषणालंकेश्वरा ॥ हाहनुमंतामहावीरा ॥
पारनसेतुमच्याउपकारा ॥ हाप्रियसखेसुग्रीवा ॥ ७४ ॥
हाजनकामिथिलापाळा ॥ हाममं‡तातास्नेहाळा ॥
हा§मातांनोयाबाळा ॥ कृपादृष्टीनेंपहावें ॥ ७५ ॥
॥वंचकहोऊनतुह्मांतें ॥ वंचिताझालोंसर्वांतें ॥
कृपाकरूनियांमातें ॥ सांभाळावेंयाकाळीं ॥ ७६ ॥

अथवा ह्या समयीं मी त्यांना हाकमारण्यासही अयोग्य आहें. कांकीं.

आर्या.

कींतेधन्यमहात्मे मीदुष्टकृतघ्नमित्रसापाचा ॥
घेतांनामेंत्यांचीं होईलविटाळत्यांसपापाचा ॥ ७७ ॥

---

* हेअग्ने. † हेपृथ्वी. ‡ हेदशरथा. § कौसल्याकैकेयीसुमित्रांनो. ॥ ठक.

जोगी. पद ७८.

जन्मुनि रविवंशीं ऐसा ॥ झालों निर्दय मी कैसा ॥ ध्रु० ॥
चित्तीं ठेवुनि यां विश्वास ॥ माझ्या अवलंबुनि न्हृदयास ॥
निजली पाहुनि यांचि त्रास ॥ झाला जिला फार आयास ॥
तिजला सोडितसें सहसा ॥ झालों निर्दय मी कैसा० ॥ १ ॥
सर्वथा उचित जिचा अन्याग ॥ तीचा करित असें मी न्याग ॥
जीवरनि न्य करीं अनुराग ॥ तिजवर झाडितसें मी आग ॥
काढितों जळा मधुनि मासा ॥ झालों निर्दय मी कैसा ॥ २ ॥
जीही शोभा सदनाची ॥ मूर्ती केवळ मदनाची ॥
विश्रांती मम न्हृदयाची ॥ माझी प्राणसखी साची ॥
तिजला घालितसें फांसा ॥ झालों निर्दय मी कैसा० ॥ ३ ॥
जीच्या उदरीं गर्भ* कठोर ॥ होतो चंचळ वारंवार ॥
नुचलेनि जग गर्भाचा भार ॥ जीचे अवयव अतिसुकुमार ॥
तिजला देतों मी कुदशा ॥ झालों निर्दय मी कैसा० ॥ ४ ॥
धावा बळी राक्षसाला ॥ तें साटाकितसें हिजला ॥
नाहीं लाज दया मजला ॥ कराया कर्म असें सजला ॥
झाला नसे कोणि ऐसा ॥ झालों निर्दय मी कैसा० ॥ ५ ॥

( इतक्यांत पडद्या पलीकडे शब्द होतो. )

अनर्थ अनर्थ काय हा अनर्थ.

राम०—अरे पहा पहा काय आहेतें.

( पुन्हा शब्द होतो. )

श्लोक.

रवि॑ सुतातटीं राहती मुनी ॥
करिति उग्र जे तप॑ निशीदिनी ॥

---

* पूर्ण. १ यमुनातीरीं. २ रात्रंदिवस.

लवणराक्षसेंत्रासदीधले ॥
ह्मणुनितूजहेशरणपातले ॥ ७९ ॥

राम०—काय, अद्यापि पृथ्वीवर राक्षसांचा त्रास आहे? असो, त्या दुरात्म्या कुंभीनसी *पुत्राचा निःपात करण्यास शत्रुघ्नाला पाठवितों. ( कितीएक पावलें पुढें जाऊन पुन्हा माघारा येतो. ) हेप्राणसखी जानकी, आतांतुझी कशी गतिहोईल नकळे.

हेभगवति †वसुंधरे हीबिचारी तुझीकन्या जानकी हिजकडेपहा.

आर्या.

विश्वंभरे ‡क्षमेया जानकिलारक्ष§निरविलीतुजला ॥
कन्यातुझीचआहे बोलायाहेंनसेचिलाजमला ॥ ८० ॥

आर्या.

जनकरघुकुलांचें‖हें मंगलकींवंशधन्यहांकेला ॥
तूंप्रसवलीसहिजला ¶पुण्यमखीं**देविपुंण्यशीलेला ॥ ८१ ॥

( असें बोलून राम निघून जातो. )

सीता—( प्रथम झोंपेंत असतां बोलते. ) हेसौम्या, हेप्राणप्रिया, कोठेंआहेस? ( अकस्मात उठून बसते. ) हायहाय दुष्टस्वप्नानें मला भ्रांतींत पाडलें, आणि उगीच मी प्राणप्रियाला हाकामारितें! ( सावध होऊन इकडे तिकडे पाहते. )

हाय हाय, मी निजलें असतां मला एकटीला टाकून माझाप्राणनाथ निघून गेला काय? यासमयीं हें असें कसें झालें? असो, आतां तो माझे दृष्टीस पडला ह्मणजे मी त्यावर रुसेन. (मनांत

*लवणासुराचा. †हेपृथ्वी. ‡हेपृथ्वी माते. §स्वाधीनकेली.
‖सीतारूप. ¶यज्ञांत. **पवित्र जानकीला.

विचारकरून ह्मणते. )पण जर माझ्यानें तसें करवेल तर. ( मोठ्यानें ह्मणते. ) कोणआहे तिकडे! कोणी *परिचारक आहेकाय? ( कोणी हाक देतनाहीं. )

दिंड्या.

असेकोठेंतोप्राणनाथमाझा ॥
दाखवाहोलवकरीरघूराजा ॥ ८२ ॥
कसागेलाटाकूनिएकटीला ॥
शीरअंकींठेवूननीजलीला ॥ ८३ ॥
कायकारणजाहलेंजावयाला ॥
कोणआलेंहोन्यासन्यावयाला ॥ ८४ ॥
तुझ्यासंगेंयेईनमीवनांत ॥
बोलिलाजेंतेंनाहिंकामनांत ॥ ८५
स्वप्नआतांतैसाचमजझाला ॥
प्राणनाथटाकूनिमलागेला ॥ ८६ ॥
हाकमारितफीरतेंप्राणनाथा ॥
येइंयेईसत्वरीजगन्नाथा ॥ ८७ ॥
तेंचझालेंकींखरेंहाकपाळा ॥
कुटेपाहूंमीप्रियाजगत्पाळा ॥ ८८ ॥
असोआतांपाहीनन्यासजेव्हां ॥
न्याजवरमीहोईनरुष्टतेव्हां ॥ ८९ ॥

( पुन्हा हाकामारते. ) कोणी परिजन तिकडे आहेकाय
( इतक्यांत दुर्मुखयेतो. )

दुर्मुख—( झटकन पुढें होऊन ) हे देवीजानकी, कुमार लक्ष्मण

*सेवक.

विनंती करतो, कीं, हा रथ सिद्धकरून आणला आहे. आपण येऊन रथावर बसावें?

**सीता**—ही मी बसावयास आलेंपहा. पण माझ्या उदरांतील गर्भ फार चंचळ होत आहे, त्याचाभार मला साहत नाहीं याजकरितां हळूहळू येतें.

**दुर्मुख**—आईसाहेब, असें इकडे यावें. हारथ आहे यावर बसावें

**सीता**—( रथांत बसतांना. )आतां ऋषिमंडळीस माझा नमस्कार असो; रघुकुल देवतांस माझा नमस्कार असो; प्राणनाथाच्या चरणकमलास माझा नमस्कार असो; आणि सकल गुरुजनांस ही माझा नमस्कार असो.

( असेंह्मणून सर्व निघूनजातात. )

चित्रदर्शननाम प्रथम अंक.

( समाप्त. )

---

# उत्तररामचरित्र नाटक.

## अंक २.

### स्थल.

दंडकारण्य.

### पात्रें.

| | |
|---|---|
| वासंती. | वनदेवता. |
| आत्रेयी | तापसी. |
| रामचंद्र. | अयोध्याधिपति. |
| शंबूक | शूद्रतपस्वी. |

( पडद्यापलीकडे शब्द होतो. ) यावें, तपस्विनी, यावें.

( इतक्यांत पांथाचा वेष धरून एक तापसी येते. )

**तापसी**—अहो ही वनदेवता, फलपुष्पपल्लवयुक्त अर्घ्यपात्र घेऊन माझी पूजा करण्याकरितां येत आहे.

**वनदेवता**—( अर्घ्यपात्र घेऊन येते, आणि तापसीला अर्घ्य समर्पून ह्मणते. )

**श्लोक.**

तुझेंसारेंआहेवन,सुदिनमातउगवलें ॥
सतांचासंतांशींपरमसुकृतेंसंगघडला ॥

तरुछायापाणीमुनिस* अशनायोग्यअसती ॥
फलेंमूलेंजींजींसकलहि† पराधीननसती ॥ १ ॥

**तापसी**—तें काय बोलावयाचें? खरेंच आहे.

श्लोक.

सदाप्रीतीचित्तीं‡ विनयमधुरावाणिहिसदा ॥
स्वभावें§ कल्याणीमतिपरिचया‖ भेदनकदा ॥
पुढेंकिंवामागेंमनिं¶ रसविपर्यासनसती ॥
**रहस्येंसाधूंचीं†† अकपट‡‡ विशुद्धेंचअसती ॥ २ ॥

**वनदे॰**—आपण कोण, आपलें नांव काय हें मला समजेल तर चांगलें होईल.

**तापसी**—मला आत्रेयी, ह्मणतात.

**वनदे॰**—हे आत्रेयी, कोणीकडून आपलें येणें झालें? आणि ह्या दंडकारण्यांत येण्याचा हेतु कोणता?

**आत्रेयी**—सांगतें ऐक. कोठून कशासाठीं आलें तें.

श्लोक.

येथेंअगस्त्यादिकजेमहर्षी ॥
वेदांतवेत्तेवसतातहर्षी ॥
त्यांपाशिवेदांतशिकावयाला ॥
वाल्मीकिपासूनच§§ यावनाला ॥ ३ ॥

**वनदे॰**—हें मोठेंच आश्चर्य. अगे, जो वाल्मीकिऋषि ब्रह्मवेत्ता

---

* भक्षणास. † तुझ्याचस्वाधीन आहेत.
‡ विनययुक्तअसून गोड. § चांगली. ‖ पालट. ¶ प्रीतींत अंतर. ** अंतरंगगोष्टी. †† निष्कपट. ‡‡ एकरूप.
§§ या वनाला आलें असा अर्थ.

पुराणमुनि, आणि मोठमोठे ऋषि ब्रह्मज्ञान प्राप्त्यर्थ ज्याची उपासना करतात, त्याला सोडून त्वां इतके लांब येण्याचा श्रम कशासाठीं घेतलाबरें?

**आत्रेयी**—काय करावें बाई, तेथें आमच्या अध्ययनास मोठी अडचण प्राप्त झाली ह्मणून इतक्या लांबचा प्रवास करणें प्राप्त झालें.

**वनदे०**—अशी कोणती अडचण आलीबरें?

**आत्रेयी**—कोणी एके देवतेनें, सर्व प्रकारांनीं अद्भुत आणि नुकतेंच ज्यांचें स्तनपान सुटलें अशावयाचीं दोन मुलें त्या वाल्मीकिमुनीला आणून दिलीं. तीं केवळ ऋषीच्याच नाहीं, पण सचराचर भूतांच्या अंतःकरणांत स्नेह उत्पन्न करणारीं अशींआहेत.

**वनदे०**—त्यांचींनांवें ठाऊक आहेत काय?

**आत्रेयी**—त्याच देवतेनें त्यांचीं कुश आणिं लव हीं नांवें सांगून त्यांचा प्रभाव ही सांगितला.

**वनदे०**—त्यांचा कोणत्या प्रकारचा प्रभाव सांगितलाबरें?

**आत्रेयी**—त्यांस सरहस्य जृंभकास्त्रें जन्मतः सिद्ध आहेत ह्मणून सांगितलें.

**वनदे०**—हा मोठाच चमत्कार.

**आत्रेयी**—ते दोन्ही मुलगे वाल्मीकिऋषीनें स्वतां दाईपणा करून पोषिले, आणि रक्षिले. त्यांचें चौलकर्म केल्यावर वेदत्रयीवर्जून शस्त्रास्त्रशास्त्रविद्येंत निपुण केलें. पुढें त्यांस अकरावें वर्ष लागलें. तेव्हां आपण गुरु होऊन क्षत्रियांच्या विधीप्रमाणें त्यांचीं उपनयनें केलीं. आणि वेदत्रयीचें अध्ययन त्यांजकडून करविलें. त्या मुलांची बुद्धि आणि

धारणा *अप्रतिम लोकविलक्षण, ह्या मुळें त्यांजबरोबर आमचा अध्ययनकरण्याचा लाग चालेना.

श्लोक.

गुरुविद्याप्राज्ञाजसितासिच †अज्ञाहि‡वितरी ॥
तयांची§धीशक्तीअधिकअथवान्यूननकरी ॥
तथापीदोषांच्याबहुतचिफलींभेददिसतो ॥
जसा||बिंबग्राही¶शुचिमणितसा**लोष्ठनसतो ॥ ४॥

**वनदे०**—हींच काय अध्ययनाला अडचण?

**आत्रेयी**—दुसरी एक आडचण आली.

**वनदे०**—दुसरी अडचण ती कोणती?

**आत्रेयी**—दुसरी अडचण अशी उत्पन्नझाली कीं, एकेदिवशीं वाल्मीकिऋषि माध्यान्हिककर्म करण्याकरितां तमसानदीच्यातीरीं गेलाहोता. तेथें क्रौंचपक्ष्यांचा एक जोडा ††विहार करीत असतां त्यांतून एक पक्षी व्याधानें मारिला, असें त्यानें पाहिलें. तेव्हां त्या ऋषीच्या मुखांतून अकस्मात् बत्तीस अक्षरांची छंदोबद्ध अशी वाणी निघाली ती अशी.

"नपावसिनिषादातूं‡‡प्रतिष्ठाकाळ§§शाश्वत ॥
कींक्रौंच||||मिथुनींएकवधिला¶¶काममोहित" ॥

**वनदे०**—वेदवाणींत छंद प्रसिद्ध आहेत. लौकिक वाणींत छंदानें हा नवाच अवतार घेतला वाटतें. हा मोठा चमत्कारच आहे.

---

*अनुपम. †जडमतीला. ‡देई. §बुद्धिशक्ति. ||प्रतिबिंब घेणारा ¶हिरा. **ढेकूळ. ††क्रीडा. ‡‡उत्तमगति. §§अखंड. ||||क्रौंचपक्ष्यांच्या युग्मांतून. ¶¶मदनानें व्याकुळ असतां.

**आत्रेयी**— त्याचसमयीं पितामहब्रह्मदेव, ज्याच्या मुखापासून शब्दब्रह्माचा आविर्भाव झाला, अशा त्या वाल्मीकिऋषीच्या जवळ प्रगट होऊन त्यास ह्मणाला, हे ऋषे, तूं शब्दब्रह्मामध्यें *निष्णात झालास. यास्तव रामचरित्राचें वर्णन कर. तुझें ज्ञानचक्षु अबाधित तेजानें †संपन्न असो.तुला आद्यकवि ह्मणतील. असें बोलून तो तेथेंच गुप्त झाला.—असा ब्रह्मदेवाचा अनुग्रह झाल्यानंतर त्या वाल्मीकिऋषीनें प्रथम मनुष्यलोकांत शब्दब्रह्माचा परिणाम रामायणरूपानें प्रसिद्ध केला. आतां सर्वलक्ष त्याचें तिकडे लागलें आहे.

**वनदेवता**—वाहवा, तरमग हा जगत्प्रपंचाचा मोठा अभ्युदयच झाला.

**आत्रेयी**—ह्या साठीं मी ह्मटलें, कीं तेथें आमच्या अध्ययनास मोठी अडचण आली ह्मणून?

**वनदे०**—हां, मग ठीकच अडचण. योग्य.

**आत्रेयी**—हे वनदेवते, मी येथें विश्रांति घेऊन स्वस्थ झालें. आतां मला अगस्तिऋषीच्या आश्रमाचा मार्ग कोणीकडून जातो तें सांग, ह्मणजे मी त्या मार्गानें तिकडे जाईन

**वनदे०**—येथून पंचवटीस जाऊन गोदावरीनदीच्या कांठानें. नीट जा ह्मणजे अगस्तीच्या आश्रमास पावशील.

**आत्रेयी**—( डोळ्यांस पाणी आणून. ) हेंच तें तपोवन? हीच पंचवटी? हीचती गोदावरीनदी? हाच प्रस्रवणनामा पर्वत? आणि जनस्थानची देवता वासंती ती तूंचना?

---

*पूर्ण. †युक्त.

